ऐतिहासिक कहाणी

# आर्किमिडीजची गुलाम

टेरी, मराठी : अश्विनी बर्वे



ऐतिहासिक कहाणी

# आर्किमिडीजची गुलाम

टेरी, मराठी : अश्विनी बर्वे



# विषयसूची

## जाणून घेण्याचे शब्द



ईसाप—एक प्राचीन यूनानी कथाकार ज्यांच्या दंतकथा काही शिकवण देतात.

आर्किमिडीज—एक प्रसिद्ध यूनानी गणितज्ञ (लगभग २८७ ई.पू. –२१२ ई.पू.).

गलोल – युद्ध काळात मोठे दगड दूर फेकण्यासाठी वापरले जाणारे प्राचीन यंत्र

यूरेका— शोध लावतांना आर्किमिडीजने म्हटलेला शब्द

सिरैक्यूज़—इटलीत सिसिली द्वीपच्या पूर्व भागातील एक यूनानी वसाहत.

अंगरखा—प्राचीन यूनानी आणि रोमन लोक घालत तो लांब सदरा

# अध्याय एक

# सिरैक्यूज़चा वाघ

सिरैक्यूज़, २१३ ई.पू.

ईसाप जो एक ग्रीक कथाकार होता, त्याने म्हटले आहे: तुम्ही एखाद्या महान व्यक्तीच्या कामात हातभार लावू शकतात,पण त्याच्या पुरस्कारात तुम्हांला हिस्सा मिळणार नाही.



माझ्या मालकांना मला मूर्ख म्हणायला आवडत असे.

“तू मूर्ख आहे, लिडा,“ ते म्हणत. “जरी तुझ्याजवळ दुप्पट डोकं असतं तरी तू मूर्खच राहिली असती.”

म्हणायला गेलं तर ते एक मोठं शहाणपणाची गोष्ट होती. माझे मालक, आर्किमिडीज, पूर्ण ग्रीकमध्ये सगळ्यात चतुर व्यक्ती होते. जर त्यांनी तुम्हांला मूर्ख म्हटलं, तर खरंच मी मूर्खच राहील.

मी त्यांची खोली साफ केली.



त्यांचे कपड़े धुतले.



त्यांच्यासाठी स्वयंपाक केला.



आणि त्यांच्या यंत्रांचे परीक्षण करायला मदत केली.



“मी दाव्याने सांगू शकतो की तुझं डोकं एकदम नवीन आणि कोरं आहे, कारण तू त्याचा कधी वापरच केला नाही,” ते मला म्हणाले.

"धन्यवाद, सर," मी उत्तर दिलं.

मी खूपच अडाणी होते, जेव्हा मी त्यांच्या वर्कशॉप मध्ये बाटल्या आणि इतर उपकरणे साफ करत असे, तेव्हा मी नेहमी त्या वस्तू पाडत असे.



कारण, आर्किमिडीज एक महान संशोधक होते, त्यांना सिरैक्यूज़चा वाघ म्हणत असत. आणि ते नेहमी वाघासारखे माझ्यावर डरकाळ्या फोडत असत.

“तू एकदम गाढव आहे, लिडा,” ते म्हणत. “अच्छा, मी तुला काय हाक मारली.?”

“गाढव,“ मी उत्तर दिले.

आर्किमिडीजच्या अंघोळीची सुद्धा एक गोष्ट आहे. ही खूप आधीची गोष्ट आहे. मी पुष्कळ वर्षांनंतर त्यांच्या बरोबर काम करायला सुरुवात केली.जेव्हा ते अंघोळीला टबात बसले तेव्हा त्यातून पाणी बाहेर फरशी पडले.



यातून त्यांना एक गणितीय विचार सापडला. जो मी कधी समजू शकले नाही. त्यानंतर आर्किमिडीज, अंघोळीच्या टबातून उडी मारून बाहेर पडले आणि सगळ्या लोकांना तो सिद्धांत सांगण्यासाठी रस्त्यावर धावले.

"यूरेका!" ते ओरडले. "यूरेका"चा अर्थ होता की त्यांना त्याचे उत्तर मिळाले.

पण आर्किमिडीज नंगे होते. त्यांनी कपडे घालण्याची वाट बघितली नाही.



ते नेहमीच अशा साधारण गोष्टी विसरून जात. आणि मला वाटतं की त्यांचे तल्लख डोक्यानेच त्यांना नंतर मारून टाकले.

ते विचार करत की प्रत्येकजण त्यांच्या शोधणे तेवढेच उत्साहित होईल जितके ते स्वतः होते. ते विसरत की इतर लोकांच्या भावना वेगळ्या होत्या आणि काही लोकांची तर बदला घेण्याची भावना अधिक प्रबळ असते.



जर ते माझ्यासारखे मूर्ख असते तर कदाचित ते आज जिवंत असते.

आर्किमिडीजला अडचणी यायला तेव्हा सुरुवात झाली जेव्हा रोमन लोक सिरैक्यूज़ला आले.

# अध्याय दोन

## रोमन लोकांचे आगमन

“तू मूर्ख आहे, लिडा, एकदम मूर्ख," आर्किमिडीज मला म्हणाले. “मला कळत नाही मी तुला कामावर का ठेवलं, कदाचित तू खूप स्वस्त मोलकरीण असशील.”



“मी स्वस्ताहून स्वस्त आहे! कारण तुम्ही मला कोणतेही वेतन देत नाही,” मी त्यांना आठवण करून दिली.



“मग तू जिवंत कशी राहते?” त्यांनी विचारलं.

“मी तुमच्यासाठी स्वयंपाक करते, त्याच्यातलं थोडंसं खाते आणि मी तुमच्या पोटमाळ्यावर गवताच्या पेंढ्यावर झोपते,” मी उत्तर दिलं.

"हुह!" ते बड्बडले. “मला वाटतं की मी तुला खूप अधिक मजुरी देतो.”

“हो, सर,“ मी म्हटलं.

त्या दिवशी रोमन लोक आमच्यावर हमला करायला आले. त्यांचे जहाज सिरैक्यूज़च्या तटापासून दूर शांत, नीळ्या समुद्रात तरंगत होते. त्यांचे सैनिक डेकवरच उभे होते कारण त्यांची जमिनीवर उतरण्याची हिंमत झाली नाही. नाहीतर वेशीवर तैनात असणाऱ्या आमच्या सैनिकांनी त्यांना बाणांनी मारलं असतं.



"सर,रोमचे लोक तटावर आल्यानंतर आपल्याला मारून टाकतील का?" मी विचारलं..



"मूर्ख मुलगी," आर्किमिडीज म्हणाले. "लिडिया, तू एक तरुण आणि स्वस्थ मुलगी आहे. ते तुला कधी मारणार नाहीत.



ते तुला उचलून घेऊन जातील आणि तुला गुलाम करतील. पण तुला माझ्यासारखा दयाळू मालक मिळणार नाही. बरोबर ना?"

"हो सर," मी म्हटलं.

आर्किमिडीजचे घर एका पहाडावर होते. आम्ही बागेच्या कुंपणावरून आणि शहराच्या वेशीवरून जेव्हा खाली पाहिली तेव्हा आम्हांला रोमन जहाज उन्हामुळे थरथरतांना दिसत होते. सूर्य खूप तापला होता. जर मला त्यावेळी थंड निळ्या पाण्यात पोहायला जाता आलं असतं तर.



"मला ती जहाजे नष्ट करावी वाटत आहे," आर्किमिडीज म्हणाला.

"तुम्ही त्यांच्यावर दगड फेकू शकतात," मी सुचवून पाहिलं.

त्यांनी माझ्याकडे पाहिलं आणि मग आपलं घामाने थबथबलेले टक्कल कपड्याने पुसलं "मूर्ख मुलगी," ते म्हणाले.



"तुम्ही त्या जहाजांच्या बाबत काही करू शकतात का?" मी विचारलं.

"कदाचित मी काही तयार करू शकतो," ते म्हणाले.

मग मी टाळी वाजवली आणि वाळलेल्या ,पिवळ्या गवतावर उडी मारली. “हे तर अद्‌भुत होईल, सर,” मी म्हटलं. “तुम्ही एक अद्‌भुत निर्माते आहात. तुम्ही आधी नदीतून शेतात पाणी घेऊन जाण्याचा उपाय सांगितला होता.”



“हो,"  त्यांनी मान हलवली. “आता लोक त्याला "आर्किमिडीज-स्क्रू (पेंच)“ नावाने ओळखतात.

“मला विश्वास आहे की तुम्ही त्या जहाजांवर मोठे मोठे दगड फेकण्याचे मशीनची नक्की निर्मिती करू शकतात,” मी म्हटलं.

माझ्या मालकाने मान हलवली. “माझ्यासाठी एक दगड शोधून आण, आणि मग मी दाखवेन की तसं करणं कसं अशक्य आहे,” ते म्हणाले.



बागेत दगड नव्हते कारण मी तण आणि दगडांना फुलांच्या बागेपासून दूरच ठेवत असे. पण बागेच्या भिंतीच्या बाहेर शेतात मोठ मोठे दगड पडलेले होते.



“मी आत्ता एक दगड आणते,” मी म्हटलं. आर्किमिडीजने हात वर उभे केले, “मूर्ख मुली, ते दगड तुझ्यासाठी खूप मोठे आहेत,” ते म्हणाले.

“मग मी दगडांना भिंतीच्या पलीकडे फेकून देईन,” मी म्हटलं.

“जर तू तो उचलूच शकणार नाही तर तो दगड फेकणार कशी?” त्यांनी वाघासारखी डरकाळी फोडली.

"अरे, ते फेकणे सोप्पे आहे!” मी हसत उत्तर दिलं. मग मी लाकडाची ती फळी उचलली, ज्याचा मी मालकाच्या बागेत बसण्यासाठी उपयोग करत असे. मी फळी माझ्या काखेत धरून बाहेर मैदानात गेले.



मी फळीचा मध्यभाग एका गोल दगडावर ठेवला आणि त्याचे डोके जमिनीवर आपटले.

मी त्या फळीच्या एका टोकावर एक मोठा दगड ठेवला. मग मी फळीच्या दुसऱ्या टोकावर उडी मारली. त्यामुळे दगड हवेत उडाला..



ते दृश्य आजही माझ्या लक्षात आहे. मला आजही माझ्या मालकाचे आर्किमिडीजचे ओरडणे आजही चांगले आठवते.

# अध्याय 3

## आर्किमिडीजची गलोल

माझा दगड ढग नसलेल्या आकाशात उडाले. ते भिंतीवरून खाली बागेत पडले. जर माझे मालक तिथं उभे नसते तर दगड नक्कीच बागेत गेले असते. त्याऐवजी तो दगड आर्किमिडीजच्या डोक्याकडे वळला.



माझ्या मालकांच्या डोक्यावर केस नव्हते. जसे सुंदर तरुण अजाक्सच्या डोक्यावर होते. अजाक्सचे चांगले केस त्याच्या सुंदर डोक्यावर विभागले गेले होते.



जर माझ्या मालकांना असे केस असते, तर दगडाने त्यांना मधून विभागले असते.त्याऐवजी दगड त्यांच्या डोक्याला धडक धडक देता देता वाचला.

आर्किमिडीज वेळीच बाजूला झाले आणि मग दगड वेगाने गवतावर पडला.

"उफ़!" मी मुर्खासारखी हसत म्हणाले, “क्षमा करा सर!”

यावेळी त्यांनी मला मूर्ख म्हटलं नाही. ते कण्हत होते आणि आता त्यांच्याजवळ मला म्हणण्यासाठी काहीच नव्हते.

त्यानंतर मी फळी बागेत परत घेऊन आले, मग त्याचा एक बेंच तयार केला आणी त्यावर मालकाला बसवले.



"तू ... तू ...," ते सुरु झाले.

"मला माहित आहे, " "मी मूर्ख आहे."



त्यांनी आपलं डोकं हलवलं आणि तसंच करत "तू तू ..मला मार .."



"मी एक मोठा दगड फेकू शकते, तेव्हा तुम्ही ते नीट बघू शकले असते," मी म्हटलं.

त्यांनी आपलं डोकं हलवलं. “तू …मला मारू शकली असती!” ते ओरडले.

"क्षमा करा, सर,“ मी म्हणाले. “जेव्हा मी छोटी होते तेव्हा आपल्या भावांबरोबर हा खेळ खेळत असे. आम्ही कपड्यांचा चेंडू हवेत उडवण्यासाठी एक छोट्या फळीचा उपयोग करत असत. मग आम्ही बघत असू की तो चेंडू कोण पकडू शकतो. पण मला हे माहित होतं की हे तंत्र दगडावरही काम करेल.”था



त्यांनी माझ्याकडे बघितलं. “तू असं का केलं?” त्यांनी विचारलं.



“कारण तुम्ही मला तुमच्यासाठी एक दगड शोधायला सांगितला होता,” मी उत्तर दिलं.

“मी म्हटलं होतं?” त्यांनी विचारलं.

“हो, तुम्हीच म्हटलं होतं.” मी म्हटलं.

“तर मीच म्हटलं!मला तुला हे दाखवून द्यायचं होतं की रोमन जहाजांवर दगड फेकणे अशक्य आहे,” ते म्हणाले.

“जर तुम्ही असं म्हणत असाल,सर” मी कुजबुजले.

“जर मला एक लांब फळी मिळाली .....”त्यांनी सुरु केलं.

“एका झाडाइतकी लांब ..”मी म्हटलं.



“हो, एका झाडाइतकी लांब ...तेव्हा मी ते जहाज बुडण्यासाठी मोठ मोठे दगड आणि बोल्डर फायर करू शकतो.” ते म्हणाले.



मी माझं तोंड आपल्या हाताने झाकलं. "ओह, सर, हे तर फारच छान आहे!” मी घोषणा केली. "ओह, सर, मला माहित होतं की तुम्ही आपल्याला वाचवण्यासाठी एखाद्या गोष्टीची निर्मिती जरूर कराल. लोक तुमच्याबद्दल जे काही म्हणतात ते खरंच सत्य आहे.

"लोक काय म्हणतात?" त्यांनी विचारलं.

"की तुम्ही सिरैक्यूज़मधले सगळ्यात चतुर व्यक्ती आहेत!" मी उत्तर दिलं.

आर्किमिडीज हसले आणि डोकं हलवलं. "मी ग्रीसमधला सगळ्यात चतुर व्यक्ती आहे," त्यांनी घोषणा केली. "वास्तवात, मी जगातला सगळ्यात चतुर व्यक्ती आहे!"

# अध्याय 4

## आर्किमिडीजसजा पंजा

तुम्हांला माहितीच आहे की पुढे काय झालं. ते इतिहासाच्या पुस्तकात लिहलं आहे. आर्किमिडीजने आपलं शक्तिशाली फेकणारे यंत्र तयार केले. त्यांनी त्याला "कॅटापुल्ट्स" वा "गलोल" म्हटलं.



सिरैक्यूज़च्या महामहिमने गर्दीला मुख्य चौकात एकत्र केलं. ते स्वतः महालाच्या खिडकीत उभे राहिले. "सिराक्यूज़च्या लोकांनी ऐका, आपण दैवाच्या बाबतीत भाग्यवान आहोत." ते म्हणाले. "जर रोमवासियोंजवळ त्यांचे जहाज आहेत, तर आपल्या जवळ आर्किमिडीज़ आहे – सिरैक्यूज़चा वाघ!"



आणि आम्ही तोपर्यंत जय-जयकार करत राहिलो जोपर्यंत आमचा घसा कोरडा पडत नाही.

"रोमन जहाज बुडाले आहे," महामहिमने पुढे म्हटलं. "आणि बाकीच्यांना समुद्रात हाकलून दिलं. महान आविष्कारक, आर्किमिडीजला सगळ्यांचे हार्दिक धन्यवाद!"

टाळ्या आणि वाह! वाह!



दुसऱ्या दिवशी सकाळी, मी मालकासाठी नाष्टा तयार करण्यासाठी अंथरुणावरून उठले. मी त्यांना बागेत तलावाजवळ गुडघ्यांवर बसलेले पाहिले. ते तलावात तरंगणाऱ्या खेळण्यांतील जहाजांना खेळण्यातील गलोलाने मारण्याचा प्रयत्न करत होते.



“तुम्हांला नाष्ट्यात काय खायला आवडेल, सर?” मी विचारलं.

त्यांनी माझ्याकडे न बघता  आपला हात हलवला. जेव्हा ते एखाद्या महत्वाच्या विचारात असत, तेव्हा ते इतर गोष्टींना फारसं महत्व देत नसत.

“रात्रीच्या वेळी, रोमन आमच्या बंदरात परत घुसतील,” ते घाईत म्हणाले.



"तर? आपण त्यांना आपल्या महान युद्ध यंत्राने मारून बुडवू शकतो," मी म्हटलं.

त्यांनी एक खडा उचलला आणि तो खेळण्यातल्या गलोलवर ठेवला. “बघ” ते म्हणाले. “बंदरात एक रोमन जहाज आहे. मी त्यावर एक दगड फेकत आहे.”

मग त्यांनी हल्ला केला. पण दगड तलावात जाऊन पडला आणि छोटे जहाज वाचले.



“मग आपण गलोल थोडं मागे घेऊन जाऊ शकतो.” मी म्हटलं.

“मी प्रयत्न केला आहे, सामान्य मुली,” त्यांनी उत्तर दिलं. त्यांनी गलोल थोडं मागे घेतला. परत त्यांनी हल्ला केला. यावेळी दगड तलावाच्या किनाऱ्यावर जाऊन पडला..



“बघ?“ ते कण्हत म्हणाले. “तो दगड बंदराच्याही मागे पडला आहे. जर आपण अशाप्रकारे चुका केल्या तर आपण आपले शहर चक्काचूर करू. रोमन चतुर आहेत. त्यांना माहित आहे की जेव्हा ते बंदराच्या एवढ्या जवळ असतील तर आपण त्याच्यावर हल्ला करू शकणार नाही..

मी नमुना बघितला आणि मग बागेतली एक फांदी उचलली. मी माझ्या अंगरख्याचा धागा काढला आणि त्या फांदीला लावला. और उसे टहनी से लटकाया. मी एक पिन वाकवली.



“तू हे काय करत आहे, मूर्ख मुली? आर्किमिडीजने विचारलं.

“जेव्हा मी छोटी होते, तेव्हा आपल्या भावांबरोबर मासे पकडत असे,” मी म्हटलं.



मी आपल्या छोट्या छडीला नमुना जहाजाच्या वर लटकवलं आणि ती हवेत उचलली. “जर रोमन बंदरात खूप जवळ आले तर आपण त्यांना पाण्यातून अशाप्रकारे बाहेर खेचू शकतो,” मी हसत म्हणाले.

“मूर्ख मुली,” ते म्हणाले. “आपण एक शक्तिशाली मासा पकडणारी छडी बनवू शकत नाही. हा मुर्खपणाचा विचार आहे.”

“मला माहित आहे, सर,” मी हो त हो मिसळला.

आर्किमिडीजने आपली बोटं चावली.

“पण जर आपण एक लांब क्रेन तयार केली,” ते माझ्या हातातून ती फांदी घेत म्हणाले, “तर आपण बंदरावर पोहचून रोमन जहाजांना पकडून ओढू शकतो.” आपण एखाद्या खेकड्याच्या पंज्याने त्या जहाजांना पकडू शकतो. यूरेका!"



मी माझ्या तोंडावर हात ठेवून ते झाकलं. "ओह, सर, हे छान आहे!” मी ओरडले. "ओह, सर, मला माहित होतं तुम्ही आम्हांला वाचवण्यासाठी काहीतरी निर्माण कराल. तुमच्याबाबत लोक जे म्हणतात ते खरं आहे.!”

"लोक काय म्हणतात?” त्यांनी विचारलं.

“की तुम्ही सिरैक्यूज़ मधील सगळ्यात चतुर व्यक्ती आहेत!” मी उत्तर दिलं.

“आम्ही याला आर्किमिडीजचा पंजा म्हणू!" त्यांनी घोषणा केली.

# अध्याय ५

## आर्किमिडीजचा अंत

आर्किमिडीजच्या पंजाने अनेक रोमन जहाजांना तोडलं आणि त्यांना परत समुद्रात ढकलून दिलं.



मग सिरैक्यूज़च्या महामहिमने चौकात लोकांना एकत्र केलं आणि त्यांना सांगितलं की माझा मालक किती महान होता. त्यांनी आर्किमिडीजला एक खूप मोठं इनाम दिलं.



ही एक मोठी अजब गोष्ट होती की त्यांचं डोकं,सरळ विचारांपासून युद्धाचे हत्यारापर्यंत बदलू शकतो. आणि ते विचार त्या खेळांपासून आले होते जे मी लहान असतांना खेळत असे.

मी खूप मूर्ख होते आणि हे बघू शकत नव्हते की युद्ध जिंकण्यासाठी त्यांचा आम्हांला कसा उपयोग होऊ शकतो. पण मला वाटलं की आपल्या मालकाच्या कामात मी ही सहभाग घेत आहे.

एक दिवस, मी एका आरशाचा उपयोग करून आग पेटवली. त्या आरशाने सूर्याच्या चमकणाऱ्या किरणांना वळवून एका बिंदूवर केंद्रित केलं.

आर्किमिडीजने हे करतांना पाहिलं आणि मग ते बडबडत तिथून निघून गेले..



दुसऱ्या दिवशी, माझ्या मालकांनी एक विशाल धातूचा आरसा तयार केला आणि त्यातून सूर्याची चमकणारी किरणे रोमन वेढ्यावर केंद्रित केली. त्यामुळे रोमन जहाजांना आग लागली.



त्यानंतर सिरैक्यूज़चे महामहिमने माझ्या मालकाला अजून अधिक धन दिलं. मला त्याचा खूप अभिमान वाटला. मला वाटलं की, अशाप्रकारे मीच त्यांना मारलं. असो, मी स्वतः त्यांचा जीव घेतला नाही. पण दोष माझा नव्हता.मी मूर्ख होते.

आपण बघा,शेवटी रोमन आमच्या जमीनवर येऊन पोहचले. ते आमच्या शहरात घुसू लागले आणि लोकांना मारू लागले आणि त्यांना शिक्षा देत राहिले.



शेवटी, ते पहाडावर आमच्या घरापर्यंत आले. माझे मालक बागेत होते. ते काहीतरी नवीन करण्याच्या प्रयत्नात होते. ते एका काठीने धुळीत गोल तयार करत होते.

एक रोमन सैनिक आमच्या फाटकाजवळ आला. “इथं कोण रहातं?” त्याने विचारलं..



“माझे मालक, आर्किमिडीज, सिरैक्यूज़चा वाघ,” मी गर्वाने म्हणाले. मी बागेकडे इशारा केला जिथं आर्किमिडीज मातीत काठीने काही खरडत होते.



शिपायांनी श्वास घेतला आणि म्हणाले, “आम्ही त्यांच्याबाबत ऐकून आहोत. जनरल मार्सेलस म्हणाले की त्यांना कोणीही त्रास देणार नाही.”

"आह!" मी म्हटलं. “ही तर फारच चांगली गोष्ट आहे. हे बघता त्यांनी तुमच्या बरोबर काय केलं “

शिपायाला काहीतरी खटकलं. “ तुझ्या म्हणण्याचा अर्थ,त्यांनी काय केलं?” त्यांनी विचारलं.

“ते विज्ञान आणि गणिताचा अभ्यास करतात.तो हानीकारक नाही. बरोबर ना?”

“हो! ही मोठी चांगली गोष्ट आहे,” मी हसले. "महान आर्किमिडीजने गलोलचा वापर करून तुमची जहाजं बुडवली.”

“ माझा मित्र त्या जहाजावर मारला गेला.” सैनिकाने आपली तलवार काढत म्हटलं.



“मग त्यांनी  आर्किमिडीजच्या पंज्याची निर्मिती केली आणि तुमचे कितीतरी जहाज बरबाद केले.”मी सांगितलं आणि परत हसले.

“ माझा भाऊ त्यात एका जहाजावर होता आणि तो पण मारला गेला.” शिपायाने आपल्या डोक्यावर तलवार उचलली आणि तो ओरडला.



“आणि , ज़ाहीर आहे, त्यांनी जाळणाऱ्या आरशाची निर्मिती केली ज्यामुळे रोमची काही जहाजे जळाली,” मी सांगू टाकले आणि थांबले.

“त्या आरशामुळे माझा हात जळाला!” शिपायाने डरकाळी फोडली.तो  माझ्या मालकाच्या दिशेने चालू लागला आणि ओरडला, "आर्किमिडीज, तू  खलनायक,  माझ्या बरोबर चल!”



माझ्या मालकाने   रोमन सैनिकांना दूर पळवून लावलं.जेव्हा ते आपला महान विचार करत असत,तेव्हा ते इतर कोणत्याही गोष्टींना महत्व देत नसत. मग ते म्हणाले, “मातीत तयार केलेल्या गोलांना खराब करू नको.”

हे माझ्या मालकाचे प्रसिद्ध अंतिम शब्द होते. ते त्यांचे अंतिम शब्द होते कारण शिपायाने वेड्या माणसा सारखी रागात त्यांच्या मानेवर तलवार चालवली.

## अध्याय ६

## एक गुलामाचे जीवन

मला माहित आहे की मी मूर्ख आहे. मी मारणाऱ्या सैनिकाला हे सांगायला नको होते की आर्किमिडीजने युद्धासाठी यंत्रांची निर्मिती केली होती.

मी सांगायला पाहिजे होतं,की "मी आपल्या मालकाला दाखवलं की गलोल कसे काम करते.माझी मासे पकडणारी छ्डीमुळे त्यांना पंजाचा विचार आला होता. आणि माझ्या आरशाने त्यांना दाखवलं की सूर्याची किरणं किती घातक होतात."



पण शिपायाने या गोष्टीवर विश्वास ठेवला नसता की एका  मूर्ख मुली जवळ इतके चांगले विचार असू शकतात. जर मी असं म्हटलं असतं, तर कदाचित  त्याने मलाच मारलं असतं! कदाचित माझ्या मूर्खपणामुळेच माझा जीव वाचला.



ही कहाणी आहे की सिरैक्यूज़च्या वाघाचे जीवन संपले.पण वाघाच्या गुलामाचे कायझाले? माझ्या बरोबर काय झाले?

तुम्हांला हे ऐकून आश्चर्य वाटणार नाही की माझ्या मालकाने बरोबर सांगितलं होतक .मला रोमन लोकांनी गुलाम केलं. पण ते एवढं वाईट जीवन नव्हतं. माझे मालक खूप दयाळू होते.

वास्तवात, हे जुन्या आर्किमिडीजच्या तुलनेत माझ्याप्रती खूप दयाळू होते, आणि त्यांनी मला कधी मूर्ख म्हटलं नाही.!



जर माझ्या म्हाताऱ्या मालकाने मरण्याआधी आपली संपत्ती माझ्याबरोबर वाटून घेतली असती.. सिरैक्यूज़चे महामहिमने त्यांना त्या चतुर यंत्रांसाठी खूप धन दिलं होतं. पण मला काहीच मिळालं नाही. खरंतर मला कधी-कधी वाटतं की मी त्यांच्या निर्मितीसाठी मदत केली..



पण मला आठवतं की इसापने एकदा सांगितलं होतं. “आपण एखाद्या महान व्यक्तीच्या कामात हातभार लावू शकतात, पण त्याच्या पुरस्कारात आपला हिसा मिळत नाही.”

# अंतिम शब्द

आर्किमिडीज जवळजवळ २८७ ते २१२ इसा पूर्व युनान मध्ये राहत होते. ते ग्रीस (यूनान) चे सगळ्यात चतुर व्यक्तींमधले एक होते. जेव्हा सिरैक्यूज़च्या ग्रीक वसाहती वर हल्ला झाला,तेव्हा त्यांनी वास्तवात रोमनांना बाहेर ठेवण्यासाठी मदत होईल अशा यंत्राची निर्मिती केली.आज आपण नक्की हे सांगू शकत नाही की त्यांनी सगळ्या यंत्रावर काम केलं,पण तरीही त्यांच्या विचारात दम होता.

निर्मितीत मदत करणाऱ्या लिडियाची कहाणी खरी नाही.पण २१५ ईसा पूर्व पासून, आर्किमिडीज आणि त्याच्या सैनिकांनी रोमन सेनेला तीन वर्ष बाहेर ठेवलं.

जेव्हा रोमनांनी सिरैक्यूज़मध्ये आपली लढाई लढले,तेव्हा ते आर्किमिडीज़वर खूप नाराज़ होते.पण त्यांना माहित होते की आर्किमिडीज एक महान व्यक्ती आहेत,आणि रोमन सैनिकांना अशा स्पष्ट सूचना होत्या की आर्किमिडीजला कोणतेही नुकसान पोहचवायचे नाही.

दुःखाची गोष्ट आहे की आर्किमिडीज धुळीत गणिताचे प्रश्न सोडवण्यात व्यग्र होते. त्यांनी रोमन सैनिकाची उपेक्षा केली जो त्यांना शोधण्यासाठी पाठवला होता. शिपाई खूपच उग्र झाला होता आणी त्याने त्या महान असहाय निर्मात्याला मारून टाकलं. आपल्या तलवारीच्या वाराने, त्याने जगातल्या सगळ्यात चतुर लोकांमधल्या एकाला मारलं.

आर्किमिडीजला सिरैक्यूज़चा वाघ म्हटलं जातं. आर्किमिडीज सारखे महापुरुषांना हजारो वर्षानंतर सुद्धा लक्षात ठेवलं जातं. पण ते केवळ त्यांच्या दम वर रोमन सेनेला हरवू शकत नव्हते.त्यांना मदतीसाठी नोकर आणि इतर सैनिकांची गरज पडली असेल.

आर्किमिडीज, शेकडो लोकांच्या मदतीने रोमन सेनेला तीन वर्षापर्यंत रोखू शकले. त्यांच्या बऱ्याच साथीदारांना आता जग विसरून गेले आहे.

ईसापने जे म्हटलं होतं ते खरं आहे, "आपण एखाद्या महान व्यक्तीच्या कामात हातभार लावू शकतात,पण त्याच्या पुरस्कारातला तुमचा हिस्सा तुम्हांला कधी मिळणार नाही."



समाप्त